**महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत शेतमालाची खरेदी करण्यासाठी लागलेल्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्याकरिता अर्थसहाय्य (२४२५ २५४२) (*Unconditional*)**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय,क्रमांक: पूरक-२०१९/प्र.क्र.१६७/२४ स**

मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२

दिनांक:- २४ जानेवारी,२०२०

**<u>संदर्भ:-</u>** (१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र. १०४/२४-स, दिनांक ७जून, २०१८,

(२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.१६७/२४-स, दिनांक १४जून.२०१८

(३) शासन परिपत्रक,वित्त विभाग
क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ ३, दिनांक २ एप्रिल,२०१८.

(४) शासन परिपत्रक, वित्त विभाग,
क्रमांक:- पूरक- २०१९/प्र.क्र.४१/अर्थ-३, दिनांक ८ मार्च,२०१९

(५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग
क्रमांक: सपस-२०१९/प्र.क्र.१७/२४ स,दिनांक ३० मार्च,२०१९

(६) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई यांचे पत्र क्रमांक नाफेड खरेदी/भावांतर/२०१९-२०/१८४,दिनांक २१ मे,२०१९

(७) शासन परिपत्र वित्त विभाग,
क्रमांक पूरक-२०१९/प्र.क्र.९३/ अर्थ-३,दिनांक ९ जुलै,२०१९

(८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक :- पुरक-२०१९/प्र.क्र.२९/१७ स, दिनांक १० जुलै, २०१९

(९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग
क्रमांक: पूरक-२०१९/प्र.क्र.७८/२४ स,दिनांक २३ ऑगस्टे,२०१९

(१०) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई यांचे पत्र
क्रमांकएमडी/नाफेड/तूर-चणा/२०१९-२०/८४७,दिनांक ५ नोव्हेंबर,२०१९

(११) शासन परिपत्रक वित्त विभाग,
क्रमांक पूरक-२०१९/प्र.क्र.११५/ अर्थ-३, दिनांक ३जानेवारी,२०२०

(१२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक :- पुरक-२०१९/प्र.क्र.१०८/१७ स, दिनांक ०४ जानेवारी, २०२०

**<u>प्रस्तावना:-</u>**

हंगाम २०१७-२०१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत हमीभावाने खरेदीसाठी ज्या तूर व हरभरा उत्पादक शेतकऱ्यांनी NeML पोर्टलवर नोंदणी केली होती. परंतु,ज्यांच्याकडून तूर व हरभरा यांची खरेदी होऊ शकली नाही, अशा तूर व हरभरा उत्पादक शेतकऱ्यांना रुपये १०००/- प्रति क्विंटल प्रमाणे अनुदान अनुक्रमे दिनांक १९ जून,२०१८ व दिनांक १ नोव्हेंबर,२०१८ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. सदर अनुदानासाठी १० क्विंटल प्रति हेक्टर व २ हेक्टर प्रति

शेतकरी ही मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. सदर अनुदान शेतकऱ्यांना वितरित करण्यासाठी पणन महासंघास सुरवातीस रुपये ७० कोटी आकस्मिकता निधीतून उपलब्ध करुन दिले असून, उर्वरित अनुदान वित्त विभागाने मंजूर केलेल्या रुपये ४८० कोटी शासन हमीद्वारे राष्ट्रीयीकृत बॅकेकडून कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन घ्यावयाचे होते. पणन महासंघाने बँक ऑफ बडोदाकडून ८.५०% व्याज दराने एकूण ३४० कोटी इतके कर्ज घेतलेले असून, या योजनेंतर्गत आतापर्यंत ३,१३,९८७ लाभार्थ्यांना रुपये ३९९.५० कोटी इतके अनुदान वाटप करण्यात आलेले आहे.

पणन महासंघाने बँकेकडून घेतलेल्या कर्जाची प्रतिपूर्ती करण्यासाठी शासन निर्णय,दिनांक ३० मार्च, २०१९ अन्वये पणन महासंघास रुपये २० कोटी दिनांक ३०.३.२०१९ अन्वये उपलब्ध करुन देण्यात आलेले आहेत.तसेच पावसाळी अधिवेशन २०१९ मध्ये मंजूर केलेल्या **रुपये ३२०.०७ कोटी** पैकी वित्त विभागाच्या दिनांक ९ जुलै,२०१९ या परिपत्रकाद्वारे पुरक मागणीच्या ९०% म्हणजे **रुपये २८८.०० कोटी** शासन निर्णय, दिनांक २३/८/२०१९ अन्वये आणि उर्वरित शिल्लक असलेला १०% निधी म्हणजे **रुपये ३२.०७ कोटी** इतका निधी शासन निर्णय, दिनांक ८/११/२०१९ अन्वये पणन महासंघास उपलब्ध करुन देण्यात आला आहे . पणन महासंघाने बँकेकडून उपलब्ध केलेले कर्ज व त्यावरील व्याजाची रक्कम शासनास अदा करावी लागते. तूर व हरभरा उत्पादक शेतकऱ्यांना अनुदान देण्यासाठी पणन महासंघाने बँकेकडून उपलब्ध केलेल्या कर्जासाठीचा व्याजदर जास्त असल्याने तसेच शासनहमीद्वारे बँक ऑफ बडोदाकडून उपलब्ध केलेल्या कर्जाची परतफेड करुन कर्ज खाते निरंक करण्यासाठी आणि उर्वरित पात्र लाभार्थींना अनुदानाची रक्कम वितरित करण्यासाठी पणन महासंघाच्या मागणीनुसार **रुपये ५८.८७ कोटी** इतका निधी सन २०१९ च्या चौथ्या(हिवाळी) अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी पणन महासंघास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात हंगाम २०१७-१८ मधील तूर व हरभरा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये १००० अनुदान देण्यासाठी वित्त विभागाने मंजूर केलेल्या रुपये ४८० कोटी शासन हमीच्याआधारे पणन महासंघाने बँक ऑफ बडोदाकडून उपलब्ध केलेल्या कर्जाची प्रतिपूर्ती करुन, कर्ज खाते निरंक करण्यासाठी **रुपये २२.२१ कोटी** आणि उर्वरित पात्र लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्यासाठी **रुपये ३५.५१ कोटी** आणि दिनांक ३१/०१/२०२० पर्यंत बँकेकडून आकारण्यात येणाऱ्या व्याजाची रक्कम **रुपये १.१५ कोटी** अशी एकूण **रुपये ५८.८७ कोटी** (रुपये अठ्ठावन्न कोटी सत्याऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम सदर शासन निर्णयान्वये शासन उपलब्ध करुन देत आहे.

२. या योजनेंतर्गत होणारा खर्च नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या पुरक मागणी निधीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक व्ही-२**
**२४२५ सहकार**
**००**
**१९५-सहकारी संस्थांना सहाय्य**
**(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य**

**(०१)(०४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत शेतमालाची खरेदी करण्यासाठी लागलेल्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्याकरिता अर्थसहाय्य**
**(अनिवार्य) (२४२५ २५४२)**
**३३, अर्थसहाय्य**

३. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेला **रुपये ५८.८७ कोटी** (रुपये अठ्ठावन्न कोटी सत्याऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम RTGS सुविधेद्वारे महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास अदा करावी. याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| मागणीदार/पुरवठादार/कंत्राटदाराचे नाव/फर्मचे नाव | महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या. मुंबई |
| कार्यालयाचे नाव व पत्ता (ज्या प्रकरणी लागू आहे) | कनमूर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, पो. बॉ. क्रमांक ५०८०, मस्जीद,मुंबई -९ |
| बँक खाते क्रमांक | 04030200001746 |
| बँक खात्याचा प्रकार | चालू खाते. |
| बँकेचे नाव | बँक ऑफ बडोदा |
| बँक शाखेचे नाव व पत्ता | शाखा मांडवी, मुंबई ४००००३ |
| बँक शाखेचा संकेतांक | १२ |
| एमआयसीआर क्रमांक | 400012043 |
| आयएफएससी संकेतांक | BARBOMANDVI |

४. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.का.गो.वळवी, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केला आहे, त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित पणन महासंघाने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा. तसेच प्रत्यक्ष मासिक खर्च केल्याची एकत्रित माहिती त्या महिन्यानंतरच्या १५ तारखेपर्यंत शासनास सादर करावी.

६. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / वित्तीय संस्थांना वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. वित्त विभागाचे अनौपचारीक सं.क्र.१६/२०२०/व्यय-२, दिनांक १६ जानेवारी,२०२० व परिपत्रक,क्रमांक पूरक-२०१९/प्र.क्र.११५/अर्थ-३,दिनांक ३ जानेवारी,२०२०अन्वये उपरोक्त

बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून, दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ परिच्छेद या योजनेस लागु नाहीत. तसेच दिनांक १८.४.२०१७ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१३३०१९२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2020.01.24 13:14:33 +05'30'

**(सुनंदा मो. घड्याळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
६) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
७) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अप्पर मुख्य सचिव(वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई-९
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१५) अध्यक्ष/सचिव, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२०) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२
२१) अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.